महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास बंदरातील भरीव गाळ उपसणी (कार्यक्रम) लेखाशिर्ष बी-७ (३०५१ ०७३२) या योजने अंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांकः बीजीटी १०२४/प्र.क्र.७८/बंदरे-२**

गृह विभाग, मंत्रालय

मुंबई ४०० ०३२

दिनांक :- २७ मार्च, २०२५

**संदर्भ**:-१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३ दि. २५.०७.२०२४

२.महाराष्ट्र सागरी मंडळ यांचे पत्र जा.क्र.मसामं/मुकाअ/साअचिस/निधी वितरण प्रस्ताव२०२४-२५/८९७/, दि२५.०२.२०२५

**शासन ज्ञापन :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता महाराष्ट्र सागरी मंडळाकडून राबविण्यात येणाऱ्या महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास बंदरातील भरीव गाळ उपसणी (कार्यक्रम) या योजनेकरीता रु.२.४० कोटी (अक्षरी रु. दोन कोटी चाळीस लाख फक्त) एवढा निधी, या शासन ज्ञापनाव्दारे मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी ज्या कामांकरीता वितरीत करण्यात येत आहे, त्याच कामांवर प्राप्त प्रशासकीय मान्यता /सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व विहित कालावधीत खर्ची पडेल, याबाबत आवश्यक ती दक्षता घेण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ यांची राहील.

३. सदर निधी खर्च करतांना वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. २५.०७.२०२४ व दि. १२.०२.२०२५ शासन परिपत्रकातील सूचनांचे व तरतुदीचे पालन करण्यात यावे. तसेच, सदरचा निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.

४. सदरचा निधी दि.३१.०३.२०२५ पूर्वी खर्च करून खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करण्यात यावीत.

५. या वितरीत करावयाच्या तरतुदीकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून लेखाधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई हे राहतील.

६. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. बी-७, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास सहायक अनुदान (०१) (०५) , बंदरात मोठया प्रमाणात गाळ उपसणी (राज्य) (कार्यक्रम) (३०५१ ०७३२)- ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर ) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर शासन ज्ञापन, नियोजन विभाग अनौ.सं.क्र.१०३/का.१४६१ दि. ०७.०३.२०२५ व वित्त विभाग अनौ.सं.क्र.२३२/२०२५/व्यय-८ दि. २७.०३.२०२५ अन्वये त्या विभागाच्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३२७१८३३३६३७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NILIMA MAHADEV KAMBLE

Digitally signed by NILIMA MAHADEV KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=0a1748b905e770db90369b30966380ad4482c802aeb9a208c0273473e9c24d7e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B635A0BA362D807D0A2AD2942C69531FAFE53ABFCAC9AB809231BD295B40EBE2, cn=NILIMA MAHADEV KAMBLE
Date: 2025.03.27 18:34:37 +05'30'

**( निलिमा कांबळे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मंत्री, बंदरे विभाग, मंत्रालय मुंबई-३२ यांचे खाजगी सचिव.
२) अपर मुख्य सचिव (बंदरे), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई.
४) वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-११), मंत्रालय, मुंबई-३२.
५) नियोजन विभाग (का. १४६१), मंत्रालय, मुंबई-३२.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र सागरी मंडळ, मुंबई
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) कार्यासन अधिकारी, बीयुडी-१, गृह विभाग.
१०) निवडनस्ती (बंदरे-२).